अवर सचिव पदावरुन उप सचिव पदावर तदर्थ पदोन्नती देणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**शासन आदेश क्रमांक : उसप-१३१५/प्र.क्र.१२९/का.१४**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग, मंत्रालय,
मुंबई ४०० ०३२
दिनांक :- १६ नोव्हेंबर २०१६

**आदेश**

श्री.व्यं.ह.कुलकर्णी, अवर सचिव, उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग यांना या आदेशाच्या दिनांकापासून उप सचिव पदावर तदर्थ पदोन्नती देण्यात येत असून, त्यांची पदस्थापना वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभागात करण्यात येत आहे.

२. श्री.व्यं.ह.कुलकर्णी, अवर सचिव यांच्याविरुध्द म.ना.से. (शिस्त व अपील) नियम १९७९ च्या नियम १० खाली विभागीय चौकशी सुरु आहे. विभागीय चौकशीच्या अंतिम निर्णयाच्या अधीन राहून पदोन्नतीबाबत जाणीवपूर्वक निर्णय घेण्याची तरतूद शासन परिपत्रक सामान्य प्रशासन विभाग क्र.एसआरव्ही-१०७५/दहा, दि.०२.०४.१९७६ व शासन निर्णय क्र.एसआरव्ही १०९५/प्र.क्र.२९/९५/बारा, दि.२२.०४.१९९६ मध्ये विहित करण्यात आली आहे. या शासन निर्णयातील तरतुदीनुसार श्री.कुलकर्णी यांनी त्यांच्याविरुध्दच्या विभागीय चौकशीअंती होणारी शिक्षा ते पदोन्नतीच्या पदावर भोगण्यास तयार असल्याबाबतचे लेखी हमीपत्र दिले आहे. श्री.कुलकर्णी यांच्याविरुध्द म.ना.से. (शिस्त व अपील) नियम १९७९ च्या नियम १० खाली सुरु असलेली विभागीय चौकशी व त्यांनी पदोन्नतीच्या पदावर शिक्षा भोगण्याचे दिलेले हमीपत्र विचारात घेऊन, शासन मान्यतेने घेतलेल्या जाणीवपूर्वक निर्णयानुसार, त्यांना खालील अटींच्या अधीन राहून उप सचिव पदावर तदर्थ पदोन्नती देण्यात येत आहे.

(अ) श्री.कुलकर्णी यांना विभागीय चौकशीच्या अंतिम निर्णयाच्या अधीन राहून उप सचिव पदावर तदर्थ पदोन्नती देण्यात येत आहे.

(ब) सदर तदर्थ पदोन्नती सामान्य प्रशासन विभागाकडून निवडसूचीवरील नियमित उप सचिव नियुक्त होईपर्यंतच्या कालावधीकरिता असेल.

(क) प्रतिनियुक्तीवर असलेले ज्येष्ठ अधिकारी यांचे प्रत्यावर्तन झाल्यानंतर त्यांच्यासाठी उप सचिव संवर्गात रिक्त पद उपलब्ध नसल्यास, श्री.व्यं.ह.कुलकर्णी, अवर सचिव यांना पदावनत करण्याच्या अधीन सदर तदर्थ पदोन्नती देण्यात येत आहे.

(ड) या तदर्थ पदोन्नतीमुळे श्री.कुलकर्णी यांना नियमित पदोन्नतीचे म्हणजेच ज्येष्ठतेचे कोणतेही हक्क प्राप्त होणार नाहीत.

(इ) सदर पदोन्नती ही केवळ तात्पुरती/ तदर्थ स्वरुपात असून प्रशासकीय निकड म्हणून देण्यात येत आहे. सदर पदोन्नती सन २०१६-१७ च्या उप सचिव पदावरील तदर्थ पदोन्नतीच्या निवडसूचीमधील खुल्या प्रवर्गाच्या पदावर समायोजित करण्यात येईल.

३. सदर उप सचिव पदावरील पदोन्नती मा.उच्च न्यायालयात दाखल केलेल्या रिट याचिका क्रमांक २७९७/२०१५ मधील अंतिम निकालाच्या अधीन राहून तसेच याचिका क्र. २९८२/२०००, २९८६/२००० व ४९५८/२००३ च्या अंतिम निकालाच्या अधीन राहून देण्यात येत आहे.

४. मा.महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, मुंबई येथे दाखल मूळ अर्ज क्र.२९६/२०१५ यातील अर्जदारांच्या मानीव दिनांक प्रकरणातील मा.न्यायाधिकरणाने दिलेल्या निर्णयानुसार निवडसूच्या/ ज्येष्ठतासूच्या सुधारित होत असल्याने, पदोन्नत होणाऱ्या अधिकाऱ्याचे ज्येष्ठतासूचीतील स्थान खाली जाणे अथवा पदावनत होणे या बाबी उद्भवू शकतात याचीही नोंद पदोन्नत अधिकाऱ्यांनी घ्यावी.

५. पदोन्नत झालेल्या अधिकाऱ्याला संबंधित विभागाने कार्यमुक्त करून या विभागास कळवावे. तसेच पदोन्नत अधिकाऱ्याने पदस्थापना केलेल्या विभागात रूजू व्हावे.

६. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१६१११६१४४२५५७१०७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Imtiyaz
Mushtaque Kazi

Digitally signed by Imtiyaz Mushtaque Kazi
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=General Administration Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=711589caceff9b0bb07e3c6556e724501d0c5ea5c63b3146314d51ec0e87d0a6, cn=Imtiyaz Mushtaque Kazi
Date: 2016.11.16 14:51:01 +05'30'

**(इ.मु.काझी)**
सह सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१) मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन
२) मा.मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव
३) प्र.स.(सेवा), सा.प्र.वि., मंत्रालय, मुंबई
४) अ.मु.स./प्रधान सचिव/ सचिव - उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग/ वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग
५) सह/उप सचिव (आस्थापना) - उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग/ वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग
६) संबंधित अधिकारी , विभागामार्फत
७) निवड नस्ती कार्या.१४